**सर ज.जी.समूह रुग्णालय व गॅन्ट शासकीय वैद्यकीय महाविद्यालय, मुंबई या संस्थेस मंजूर अनुदानातून यंत्रसामुग्री व साधनसामुग्री खरेदीस प्रशासकीय मान्यता प्रदान करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग,

**शासन निर्णय, क्रमांक : यंत्रख-२०२५/प्र.क्र.११५/प्रशा-१,**

गोकुलदास तेजपाल रुग्णालय आवार, नवीन गो.ते.संकुल,

९ वा मजला, मंत्रालय, मुंबई -४०० ००१.

दिनांक : २८ मे, २०२५

**वाचा :**

१) शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, क्र. भांखस-२०१४/प्र.क्र.८२/ भाग-III / उद्योग-४, दिनांक ०१.१२.२०१६.

२) शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग, क्रमांक खरेदी-२०१६/प्र.क्र.२४०/ आरोग्य-८, दिनांक २६.०७.२०१७.

३) शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, क्रमांक संकीर्ण-२०१६/ प्र.क्र.२१५/ उद्योग-४, दिनांक २४.०८.२०१७

४) शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, क्र. भांखस-२०२१/प्र.क्र.८/ उद्योग-४, दिनांक ०७.०५.२०२१.

५) आयुक्त, वैद्यकीय शिक्षण व आयुष, महाराष्ट्र राज्य, यांचे पत्र क्र. क्र.संवैशिवसं / यंसाख/म/प्रमा/१३७०/२०२५, दि.१४.०२.२०२५

**शासन निर्णय :**

विभागाच्या अधिपत्याखालील सर ज.जी.समूह रुग्णालय व गॅन्ट शासकीय वैद्यकीय महाविद्यालय, मुंबई या संस्थेस आशियाई विकास बँकेच्या प्रकल्पांतर्गत उपलब्ध अनुदानातून खालील तक्त्यात नमूद केलेली यंत्रसामुग्री व साधनसामुग्री खरेदी करण्यास एकूण रुपये ३०,८०,००,०००/- (रुपये तीस कोटी, ऐंशीलक्ष फक्त) (सर्व करांसहीत) इतक्या किंमतीची टर्न की यंत्रसामुग्री व साधनसामुग्री खरेदीस या शासन निर्णयान्वये पुढील अटींच्या अधीन राहून प्रशासकीय मंजूरी देण्यात येत आहे.

| अ.क्र | यंत्रसामुग्रीचे नाव | नग संख्या | प्रति नग किंमत (सर्व करांसहित) | एकूण किंमत (सर्व करांसहित) |
|---|---|---|---|---|
| १ | Pediatric Endoscopy Suite-Supply, Installation, Testing & Commissioning of Pediatric Surgery Equipment & Instrument on Turnkey Basis | १ | ३०,८०,००,००० | ३०,८०,००,००० |
| एकूण | | | | ३०,८०,००,००० |

अटी :-

१. सदर प्रशासकीय मान्यता शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व रुग्णालयांना आशियाई विकास बँकेच्या प्रकल्पांतर्गत तसेच राज्य योजनेंतर्गत उपलब्ध झालेल्या/होणाऱ्या अनुदानातून संबंधित संस्थेस निधी उपलब्धतेच्या अधीन राहून प्रदान करण्यात येत आहे.

२. सदर विषयी "शासकीय विभागाने करावयाच्या कार्यालयीन खरेदीसाठीच्या कार्यपध्दतीची नियमपुस्तिका" याबाबत उद्योग, ऊर्जा व कामगार विभागाने निर्गमित केलेल्या शासन निर्णय क्र. भांखस-२०१४/प्र.क्र.८२/भाग-III/उद्योग-४, दिनांक ०१.१२.२०१६ व अनुषांगिक शासन निर्णयांमध्ये नमूद केलेल्या विहीत कार्यपध्दतीचे अनुपालन करण्यात यावे.

३. प्रशासकीय मान्यता देताना प्रस्तावित खरेदीचे दर हे अंदाजित आहेत. त्यामुळे खरेदी प्रक्रियेअंती दर निश्चित करण्यात यावेत. सदर दर हे बाजारभावापेक्षा कमी असल्याबाबत आणि संबंधित पुरवठादाराने याबाबींचा इतर ठिकाणी ज्या दराने पुरवठा केला आहे, त्या दरापेक्षा जास्त नसल्याबाबतची खातरजमा आयुक्त (वैद्यकीय शिक्षण) तसेच संबंधित अधिष्ठाता यांनी करावी.

४. सदर यंत्रसामुग्रीची विनिर्दिष्टे (Technical specification) व्यापक, सर्वसमावेशक असून त्यानुसार साधनपुरवठा करु शकणारे किमान तीन उत्पादक/पुरवठादार यांचेकडून तीन निविदा प्राप्त होऊ शकतील अशा प्रकारची असावीत. तसेच, सदर तांत्रिक विनिर्देश (Technical specification) हे कोणत्याही विशिष्ट कंपनीला फायदा होईल, अशा रितीने तयार केलेले नसल्याबाबत खातरजमा करण्यात आल्यानंतरच सदर बाबींची खरेदी प्रक्रिया करण्यात यावी.

५. प्रस्तावित यंत्रसामुग्रीचा समावेश इतरत्र कोणत्याही प्रस्तावात अंतर्भूत केलेला नसल्याबाबत/खरेदीची व्दिरुक्ती होणार नाही व सदर साधनसामुग्री संबंधित संस्थेस आवश्यक असल्याबाबत आयुक्त (वैद्यकीय शिक्षण) व संबंधित अधिष्ठाता यांनी खात्री करावी.

६. सदर विषयी यंत्रसामुग्री खरेदीबाबत निर्णय घेताना प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आलेल्या लेखाशिर्षाखाली मंजूर अनुदानाच्या तरतूदीपेक्षा जास्त खर्च केला जाणार नाही याची दक्षता घ्यावी.

७. मुख्य यंत्र व त्यांचे सुटे भाग (Accessories) यांच्या किंमती भिन्न दर्शाविणे आवश्यक राहील.

८. संपूर्ण खरेदी प्रक्रिया राबविताना केंद्रिय दक्षता आयोगाच्या मार्गदर्शक सूचनांचे (CVC Guidelines) तंतोतंत पालन करण्यात यावे.

९. उपरोक्त शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, दिनांक ०१.१२.२०१६ मधील परिच्छेद क्रमांक ३.१.२ "किंमतीचा अंदाज व किंमतीचा वाजवीपणा" या शीर्षकाखालील परिच्छेद क्रमांक ३.१.२.१ मधील तरतूदीचे राज्यस्तरीय खरेदी समितीने अनुपालन करावे.

**२.** सदर यंत्रासामुग्री खरेदीसाठी येणारा खर्च एडीबी च्या PBL (Policy Based Loan) अंतर्गत प्राप्त झालेल्या अर्थसहाय्यातून भागविण्यात यावा. तसेच याबाबतचे लेखे स्वतंत्रपणे ठेवण्यात यावेत.

३. सदर शासन निर्णय, वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांक: विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/१३/ विनियम, दिनांक १७.०४.२०१५ अन्वये तसेच वित्तीय अधिकार नियम पुस्तिका भाग-१, उप विभाग-

२, अनुक्रमांक-३, नियम क्रमांक-७ अनुसार प्रशासकीय विभागास असलेल्या अधिकारान्वये निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२५०५२८१६२६०७१११३ असा आहे. हा आदेश डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SUDHIR JAYA SHETTY

Digitally signed by SUDHIR JAYA SHETTY
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=MEDICAL EDUCATION AND DRUGS DEPARTMENT, 2.5.4.20=72ea277025fdf5a4898b244953b82406eea05963bc456f1e1e8621e5917d8305, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=E9D37D499A521B728AEB3DC8EC38B759420308B9FD7816002B4AF0FFBF1111D7, cn=SUDHIR JAYA SHETTY
Date: 2025.05.28 18:23:38 +05'30'

**(सुधीर जया शेट्टी)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रति,

१) आयुक्त (वै.शि.), वैद्यकीय शिक्षण आणि संशोधन, मुंबई
२) महालेखाकार - १/२ ( लेखा परिक्षा /लेखा व अनुज्ञेयता ) महाराष्ट्र, मुंबई/नागपूर
३) उप सचिव (शिक्षण), वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग, मुंबई
४) संचालक, वैद्यकीय शिक्षण आणि संशोधन, मुंबई
५) अधिष्ठाता, सर ज.जी.समूह रुग्णालये, मुंबई
६) अधिदान व लेखाधिकारी, मुंबई
७) निवासी लेखाधिकारी, मुंबई
८) Health Expert, ADB
९) निवडनस्ती (प्रशा-१)